राष्ट्रीय सहकारी विकास निगम योजनेअंतर्गत
भागभांडवल व कर्ज मिळण्याबाबत.
पॅरामाऊंट टेक्सटाईल निटींग अॅन्ड गारमेंट औद्योगिक
सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि. नागपूर

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र. यंत्रमाग- २००९/प्र.क्र.८३/टेक्स-२**
**१६ वा माळा, नवीन प्रशासकीय भवन,**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक :- २९ मार्च, २०१७.**

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- यंत्रमाग-१३९८/प्र.क्र.१५८/टेक्स-२, दिनांक २४ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांक:- यंत्रमाग-१३०६/प्र.क्र.१४१/टेक्स-२, दिनांक २२ जानेवारी, २००९.
३) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्रमांक:-कार्या-रासविनि/११५३/०९, दिनांक २१ फेब्रुवारी, २००९.
४) राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांचे पत्र क्रमांक:- एनसीडीसी ५-१३/ २०१३-एचएलएम(पीएल)/२७१/एसए ३०१९०, दिनांक ४ फेब्रुवारी, २०१४.
५) राष्ट्रीय सहकारी विकास निगम यांचे पत्र क्रमांक:- एनसीडीसी ५-१३/ २०१३-एचएलएम(पीएल), दिनांक २३ जून, २०१५.
६) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६.
७) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्रमांक :-संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा. प्रशा-५, दिनांक १० मे २०१६.
८) वित्त विभाग शासन परिपत्रक क्रमांक:- अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक ०८ फेब्रुवारी, २०१७.

**प्रस्तावना :-**

यंत्रमाग सहकारी संस्थांच्या विकासासाठी अर्थसहाय्य करण्याच्या दृष्टीकोनातून राष्ट्रीय सहकारी विकास निगमच्या योजनेअंतर्गत पॅरामाऊंट टेक्सटाईल निटींग अॅन्ड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि. नागपूर या संस्थेच्या गारमेंट मॅन्युफॅक्चरींग घटकांसाठी (Garment Manufacturing Unit) रुपये २३१.३८ लाख (रुपये दोन कोटी एकतीस लाख अठ्ठयानऊ हजार फक्त) इतक्या खर्चाच्या प्रकल्पास राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली यांनी त्यांच्या संदर्भ क्रमांक ४ वरील पत्रान्वये पुढील आकृतीबंधानुसार अर्थसहाय्य करण्यास मंजूरी दिलेली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १) सभासद वर्गणी | | १०% | रु. २३.१४ लाख |
| २) शासकीय भागभांडवल | | ४०% | रु. ९२.५५ लाख |
| ३) राष्ट्रीय सहकारी विकास निगमकडून कर्ज | | ५०% | रु. ११५.६९ लाख |
| | एकूण | १००% | रु. २३१.३८ लाख |

राष्ट्रीय सहकारी विकास निगमच्या वरील मान्यतेनुसार संस्थेस गारमेंट मॅन्युफॅक्चरींग घटकांसाठी (Garment Manufacturing Unit) उभारणीकरीता मंजूरी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

या प्रस्तावाचा सर्वांगीण विचार करुन शासन पॅरामाऊंट टेक्सटाईल निटींग ॲन्ड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि. नागपूर या संस्थेच्या रुपये २३१.३८ लाख (रुपये दोन कोटी एकतीस लाख अठ्ठयानऊ हजार फक्त) प्रकल्प खर्चास तसेच प्रकल्पाची उभारणी करण्यासाठी राष्ट्रीय सहकारी विकास निगमने मंजूरी दिल्यानुसार प्रथम हप्त्यापोटी **शासकीय भागभांडवल रु.४६.२८ लाख (रुपये शेचाळीस लाख अठ्ठावीस हजार फक्त) व रासविनी कर्जापोटी रु.२८.९२ लाख (रुपये अठ्ठावीस लाख ब्यानऊ हजार फक्त) असे एकूण रुपये ७५.२० लाख (रुपये पंच्याहत्तर लाख वीस हजार फक्त)** इतकी रक्कम मंजूर करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

२. वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या भाग भांडवल व कर्जाची रक्कम आहरीत करुन संस्थेस वितरीत करण्याकरीता श्री. र. ग. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोखशाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्री. ब.बा. चव्हाण, उप सचिव (वस्त्रोद्योग) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई -३२ यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या भाग भांडवल व कर्जाची रक्कम अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई येथून काढून पॅरामाऊंट टेक्सटाईल निटींग ॲन्ड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि. नागपूर **(PARAMOUNT TEXTILES KNITTING & GARMENTS COOPERATIVE SOCIETY LTD., KAMPTEE, TALUKA- KAMPTEE, DIST-NAGPUR)** या संस्थेच्या आय. सी.आय.सी.आय, शाखा-कामठी, राणी कोठी, पोलीस लाईन, जी. एन. रोड, कामठी, ता. कामठी, जि. नागपूर येथील खाते क्रमांक 14620500114, MICR CODE-440229011, IFSC CODE-ICIC0001462, या खात्यावर RTGS व्दारे वितरीत करण्याची कार्यवाही करावी.

३. यावर होणारा खर्च पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू आर्थिक वर्षी (सन २०१६-१७) करीता मंजूर झालेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

अ) भागभांडवल रुपये ४६,२८,०००/- (रुपये शेचाळीस लाख अठ्ठावीस हजार फक्त)
<u>मागणी क्रमांक व्ही-३</u>
४८५१-ग्रामोद्योग व लघुउद्योग यावरील भांडवली खर्च
(००)(१०९) संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग सहकारी संस्था,
(०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना
(००)(०४) यंत्रमाग सहकारी संस्थांना भागभांडवली अंशदान
(एनसीडीसी) (४८५१ ०५४२) ३२, अंशदाने.

ब) रासविनी कर्ज रुपये २८,९२,०००/- (रुपये अठ्ठावीस लाख ब्यानऊ हजार फक्त)
<u>मागणी क्रमांक व्ही - ५</u>
६८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग यासाठी कर्जे,
(००) (१०९), संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग सहकारी संस्था,
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजनांतर्गत योजना)
(००) (२०) यंत्रमाग सहकारी संस्थांना कर्जे ( रा.स.वि.म. ),
(६८५१ ०३५९) ५५, कर्जे व आगाऊ रकमा

४. याद्वारे वितरीत करण्यात येणा-या रक्कमेचा योग्य विनियोग केल्यासंबंधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संस्थेने, वस्त्रोद्योग संचालनालयामार्फत दोन महिन्याच्या आत शासनास सादर करावे, किंबहुना ही जबाबदारी संबंधीत प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांची राहील.

५. सदर संस्थेने संचालनालयास प्रस्ताव सादर करतांना सादर केलेला संस्थेचा वार्षिक लेखापरीक्षण अहवाल व त्यानंतर सध्याचे आर्थिक वर्ष समाप्त होण्याचा कालावधी या दरम्यानच्या कालावधीचे वार्षिक लेखापरिक्षण अहवाल प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांची राहील. त्याप्रमाणे संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी पुर्तता करुन घेवून अहवालासह वस्तुस्थिती शासनास सादर करावी.

६. प्रकल्प किंमतीमध्ये कालांतराने वाढ झाली तर वाढीव किंमतीची रक्कम संस्थेने स्वबळावर उभी करणे आवश्यक आहे. त्याचप्रमाणे संस्थेने प्रकल्प ठरलेल्या वेळी पूर्ण करण्यासाठी प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी सातत्याने पाठपुरावा करावा. निधीचा दुरुपयोग होणार नाही याची दक्षता घ्यावी. दर तिमाहीस कामाचा आढावा घेण्याची जबाबदारी प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांची राहील.

संस्थेच्या प्रस्ताव दाखल करतेवेळी असलेली प्रकल्प किंमत व सध्याच्या किंमतीमध्ये झालेली वाढ यातील वाढीव किंमतीची रक्कम संस्थेने स्व बळावर उभी करणे आवश्यक आहे. प्रकल्प प्रस्तावात नमुद केल्याप्रमाणे बांधकाम /मशिनरीचे काम पुर्ण करुन घेण्याची दक्षता संचालक (वस्त्रोद्योग) यांनी घ्यावी.

७. संस्थेस देण्यांत आलेल्या कर्ज व भागभांडवल रक्कमेच्या २० टक्के इतकी संस्थेच्या संचालकांची स्व-मालमत्ता शासनास तारण म्हणून ठेवण्यांत यावी.

८. संदर्भिय अनु क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती तसेच नव्याने लागू करण्यात आलेल्या / येणा-या सुधारीत अटी व शर्ती संस्थेवर बंधनकारक राहतील. त्याचप्रमाणे सदरील अटी व शर्तीन्वये आवश्यक कागदपत्रांची पूर्तता ३ महिन्यांत करुन घेण्याची कार्यवाही संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी करावी.

अ) संस्थेची चल अचल संपुर्ण मालमत्ता (Assets) शासनास तारण (Hypothecation) म्हणून ठेवण्यांत यावी.

ब) संस्थेने त्यांचे स्व-भागभांडवल Designated Account मध्ये जमा केल्यानंतर आणि संस्थेस देण्यात आलेल्या कर्ज व शासकीय भागभांडवल रक्कमेच्या, २० टक्के इतकी संस्थेच्या संचालकांची स्व-मालमत्ता, शासनाकडे तारण म्हणून जोपर्यंत प्राप्त होत नाही तोपर्यंत या आदेशाव्दारे संस्थेस मंजूर केलेल्या रक्कमेची संस्थेस उचल करता येणार नाही किंवा त्या रक्कमेवर संबंधित संस्थेस अधिकर्ष (Overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही.

क) प्रस्तुत संस्थेच्या संचालक मंडळाची जेंव्हा जेव्हा निवडणूक होईल तेंव्हा तेंव्हा नवीन संचालक मंडळास ३ महिण्यांचे आत संस्थेस मंजूर करण्यात आलेल्या कर्ज व शासकीय भागभांडवलाच्या अनुषंगाने २० टक्के स्व-मालमत्ता शासनाकडे तारण म्हणून ठेवावी लागेल तसेच नव्याने नियुक्त संचालक मंडळाने असे तारण दिल्यानंतर पुर्वीच्या संचालक मंडळास तारणमुक्त करता येईल, अशी सुधारणा संस्थेच्या Bye Laws मध्ये करण्याबाबत संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी आवश्यक ती कार्यवाही करावी.

ड) संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर व प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी राष्ट्रीय सहकारी विकास निगमने विहित केलेल्या अटी व शर्तीनुसार योजना राबवावी. त्यासाठी संस्थेच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष ठेवून त्याबाबतच्या प्रगतीचा विहित विवरणपत्रातील मासिक प्रगती अहवाल राष्ट्रीय सहकारी विकास निगमला तसेच शासनास वेळोवेळी सादर करावा, त्याचा आढावा संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी घ्यावा.

इ) संस्थेची नोंदणी ७/१२ नमून्यावर अथवा प्रापॅर्टी कागदावर नोंद करुन त्याची नोंद राज्यपाल यांचे नांवे गहाणखत करुन घेण्याची कार्यवाही प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी करावी.

प) सदर संस्थेस बांधकाम व यंत्रसामुग्रीकरिता संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांचेकडून आवश्यक मंजूरी घेणे व ई-टेंडरींग प्रक्रीयांचे अवलंबण करणे बंधनकारक राहील तसेच विविध खरेदीच्या अनुषंगाने खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS व्दारे अदा करावी, याबाबतचे नियंत्रण संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी ठेवावे.

फ) संचालक (वस्त्रोद्योग) यांनी शासनास सादर केलेल्या अहवालातील अटींची पुर्तता संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी करुन घ्यावी.

भ) संस्थेच्या १०% स्वभाग भांडवलाची पुर्तता होणेकरीता संस्थेकडुन संस्थेच्या Designated Account मध्ये रु.१.५९ लाख इतकी रक्कम भरुन घेण्याची कार्यवाही संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी करावी.

म) सदर संस्थेने प्रस्ताव करतेवेळीची जमीन बदलून कवठा प.ह.नं.१५, तह.कामठी जि.नागपुर येथील जमीन खरेदी केल्याची कागदपत्रे सादर केली आहे. हे पहाता नव्याने खरेदी केलेल्या जमिनीवरच संबंधित संस्थेकडुन खर्च होईल याचा संचालक (वस्त्रोद्योग) यांनी पाठपुरावा करावा.

९. संस्थेस या योजनेअंतर्गत अर्थसहाय्य मंजूर केल्यानंतर शासकीय भागभांडवल व रा.स.वि.नि. कर्ज रुपाने मंजूर करण्यात आलेले अर्थसहाय्य खाली नमूद केल्याप्रमाणे शासनास परत करणे संस्थेवर बंधनकारक आहेः-

अ) या योजनेअंतर्गत मंजूर करण्यात आलेल्या भागभांडवलाची रक्कम प्रकल्प पूर्ण झाल्याच्या दिनांकापासून दहा समान हप्त्यात दहा वर्षात शासनास परत करणे आवश्यक आहे. ही रक्कम संबंधित संस्थेने मागणी शिर्ष क्रमांक ०४२५, सहकार, ८०० इतर जमा रक्कमा, ०३ रा.स.वि.नि. कडील जमा (०४२५ ००३६) या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी.

ब) या योजनेअंतर्गत मंजूर केल्या जाणा-या कर्जाची रक्कम, प्रकल्प पूर्ण झाल्याच्या दिनांकापासून किंवा १ वर्षाचा Moratorium Period नंतर यातील जे अगोदर घडेल तद्नंतर आठ समान हप्त्यात, आठ वर्षात परत करणे बंधनकारक असेल. कर्जाची रक्कम मागणी शिर्ष क्रमांक ६८५१, ग्रामीण व लघुउद्योग कर्जे, १०९ संयुक्त ग्रामीण व लघुउद्योग सहकारी संस्था, हातमाग व यंत्रमाग सहकारी संस्थांना कर्जे (६८५१ ५१०९ ००) या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी.

क) या योजनेअंतर्गत मंजूर केल्या जाणा-या कर्जावरील व्याज कर्ज दिल्याचे दिनांकानंतर त्या आर्थिक वर्षाचे अखेरपर्यत रक्कम दिनांक ३१ मार्च पर्यंत देय असलेल्या व्याजाची राष्ट्रीय सहकारी विकास निगमाने वेळोवेळी / प्रतिवर्षी मंजूर केलेल्या दरानुसार परिगणना करुन येणारी रक्कम दिनांक ३० सप्टेंबर पूर्वी भरणे संस्थेवर बंधनकारक आहे. तसेच याकरिता Moratorium Period ची सवलत असणार नाही. सदर व्याजाची रक्कम प्रधान शीर्ष ००४९ व्याजाची जमा रक्कम ०४ राज्य / संघराज्य क्षेत्र शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा, १९५ सहकारी संस्थांकडून व्याज, (०१) सहकारी संस्थांकडून व्याज (०१) (११) सहकारी औद्योगिक संस्था (००४९ १२२८) या लेखाशिर्षाखाली जमा करण्यात यावी.

ड) वरीलप्रमाणे भागभांडवल, कर्ज व व्याजाची रक्कम विहित मुदतीत न भरल्यास संबंधित संस्थेवर वरील व्याजाच्या रक्कमेव्यतिरिक्त वार्षिक २.५% दराने दंडनीय व्याजाची आकारणी करण्यात येईल. तसेच दंडनीय व्याज याकरिता Moratorium Period ची सवलत असणार नाही.

१०. वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये ३२ अंशदाने व ५५ कर्जे या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ पैकी ११, १२, १३, १६, १७ व १८ या प्रकरणी लागू नाही. परिच्छेद ७ अ, ७ब, ७क, ८, ९ व १० ची या प्रकरणी लागू असलेल्या अटींची तसेच तपासणी सूचीप्रमाणे (परिशिष्टातील अनुक्रमांक ९) सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे. अनु.क्र.१४ व १५ संस्थेच्या बांधकाम व यंत्रसामुग्री विषयक प्रस्तावासंदर्भात आवश्यक तेथे प्राधिकृत अधिकारी/समितीची मान्यता घेतल्यानंतर व नवीन खरेदी धोरणानुसार ई-टेंडरींग प्रक्रीयांचे अवलंबण करणे बंधनकारक आहे.

११. वित्त विभाग परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद ब मधील २ नुसार वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र. क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिशिष्टातील अनु.क्र.१,२,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. व सदर योजना ही Regular राज्य योजनांतर्गत योजना असल्याने अंशदान याखाली शासकीय भागभांडवल व कर्जे याखाली रा.स.वि.म. कर्जे वितरण असल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

१२. वित्त विभाग परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद ब मधील ३ नुसार वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिशिष्टातील अनु.क्र.३ मधील तरतुदी विचारात घेता योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही.

१३. वित्त विभाग परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मधील परिच्छेद ब मधील ३ नुसार वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या परिशिष्टातील अनु.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील याप्रकरणी लागू असलेल्या मुद्दयांची पुर्तता होत आहे.

१४. वित्त विभाग परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ परिच्छेद अ नुसार याप्रकरणी माहिती खालीलप्रमाणे आहे :-

**अ) विभागास प्रदान वित्तीय अधिकार :-** वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये ३२ अंशदाने व ५५ कर्जे या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची सदर प्रकरणी पुर्तता होत आहे.

**ब) मंजूर निधी :-** “मागणी क्रमांक व्ही-३, ४८५१-ग्रामोद्योग व लघु उद्योगावरील भांडवली खर्च, (००)(१०९) संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग सहकारी संस्था, (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना-(००)(०४) यंत्रमाग सहकारी संस्थांना भागभांडवली अंशदान (एनसीडीसी) (४८५१ ०५४२) ३२, अंशदाने” या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु.१९००.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित आहे. **तसेच** “मागणी क्रमांक व्ही -५, ६८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग यासाठी कर्जे, (००) (१०९), संमिश्र

ग्रामोद्योग व लघुउद्योग सहकारी संस्था, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (राज्य योजनांतर्गत योजना)-(००) (२०) यंत्रमाग सहकारी संस्थांना कर्जे (रा.स.वि.म), (६८५१ ०३५९) ५५, कर्जे व आगाऊ रक्कमा" या लेखाशिर्षाखाली सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात रु.१०००.०० लाख अर्थसंकल्पित निधी विभागास प्राप्त झालेला आहे.

**क) मागील ३ महिन्यापुर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे :-**
**होय.** तीन यंत्रमाग सहकारी संस्थांना भागभांडवलापोटी रु. १३९.१७ लाख व चार यंत्रमाग सहकारी संस्थांना रासविनि कर्जापोटी रु.१४३.१७५ लाख असे एकूण रु. २८२.३४५ लाख इतका निधी खर्च झालेला आहे.

**ड) ज्या लेखाशिर्षाखाली अनुदान वितरीत करण्यांत येत आहे त्या लेखाशिर्षाअंतर्गत १ वर्षापुर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही :-** या योजनेखाली १ वर्ष जुने संक्षिप्त देयक त्याच लेखाशिर्षाखाली प्रलंबित नाही.

**इ) स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देतांना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यांत आली आहे :-** लागू नाही.

**प) वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करतांना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे :-** लागू नाही.

**फ) बांधकाम विषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देतांना सक्षम अधिका-यांची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा :-** लागू नाही.

**भ) अधिनस्त कार्यालयांना खरेदी करण्यासाठी प्राधिकृत करण्याचा शासन निर्णय निर्गमित करण्यापुर्वी अशा खरेदीसाठी रीतसर प्रशासकीय मान्यतेचे आदेश काढावेत :-** लागू नाही.

**म) खरेदी विषयक प्रक्रीया अद्यावत संबंधित शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेस असावा :-** सहकारी यंत्रमाग संस्थांच्या बांधकामास व यंत्रसामुग्री खरेदीबाबत सनियंत्रण समितीची स्थापना करण्यात आली आहे. सदर समित्यांची मान्यता घेऊनच संस्थेने बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी करणे बंधनकारक आहे.

**य) साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS व्दारे आहरीत करावी :-** सदर सहकारी गारमेंट मॅन्युफॅक्चरींग संस्थेने खरेदीबाबत खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नांवे ECS व्दारे अदा करावी अशा सूचना सदर संस्थेस या आदेशाव्दारे देण्यांत आल्या आहेत.

१५. वरील शासन निर्णयांव्दारे संस्थेवर ठेवण्यात आलेल्या अटी सदर संस्थेने पुर्ण करेपर्येत या आदेशाव्दारे संस्थेस मंजूर केलेल्या रक्कमेची संस्थेस उचल करता येणार नाही किंवा त्या रक्कमेवर संबंधित संस्थेस अधिकर्ष (Overdraft) काढून रक्कम खर्च करता येणार नाही याबाबत संस्थेवर व बँकेवर संचालक (वस्त्रोद्योग), नागपूर यांनी बंधन आणावे.

१६. हा शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दिनांक २० एप्रिल, २०१६ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१७०४१९१५३७३४०९०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Pralhad
Shankar Rode

Digitally signed by Pralhad Shankar Rode
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=31ef26ac53da8a20dab1e924c7b422c7000cf345d3ffe590e023fa4caeb62a9d, serialNumber=4d2b0898965971393 48b165010a1a897e0fe12960037e28eb35541425e312388, cn=Pralhad Shankar Rode
Date: 2017.04.19 15:41:20 +05'30'

**( प्रल्हाद रोडे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, ( लेखापरीक्षा ) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई / महाराष्ट्र-२ नागपूर.
३) प्र.स. (वस्त्रोद्योग), यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ३२.
४) उप सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) कार्यासन अधिकारी (रोख शाखा) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग. (३ प्रती)
६) व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सहकारी विकास निगम, नवी दिल्ली.
७) विभागीय संचालक (पश्चिम), राष्ट्रीय सहकारी विकास निगम, ५ बी.जे.रोड,पुणे.
८) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) संचालक (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर.
१०) प्रादेशिक उपसंचालक (वस्त्रोद्योग), नागपूर.
११) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर, जि. नागपूर.
१२) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१३) संचालक, लेखा व कोषागारे (संगणक विभाग), नविन प्रशासकीय भवन, मुंबई.
१४) सहसंचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६) नियोजन विभाग (कार्या-१४३१), मंत्रालय, मुंबई ३२.
१७) वित्त विभाग ( व्यय-२/अर्थसंकल्प-१३), मंत्रालय, मुंबई.
१८) अवर सचिव (२१-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) कक्ष अधिकारी ( १६-स / १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (२ प्रती)
२१) चेअरमन, पॅरामाऊंट टेक्सटाईल निटींग ॲन्ड गारमेंट औद्योगिक सहकारी संस्था मर्या., कामठी, ता. कामठी, जि. नागपूर
२२) निवड नस्ती (टेक्स-२)